नवभारत साक्षरता योजनेकरिता सन २०२४-२५ च्या मंजूर तरतूदीतून खर्च करण्यासाठी प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत. (अनुसूचित जाती घटक) (केंद्र व राज्य हिस्सा)

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नभासा-१७२५/प्र.क्र.६२/एस.डी.२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २५ मार्च, २०२५

**संदर्भ:-** १)शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.नभासाका-०३२२/प्र.क्र.३९/एसडी-२, दि.१४.१०.२०२२
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,शासन निर्णय क्र. नभासाका-०३२२/प्र.क्र.३९/एसडी-२, दि.२५.१.२०२३
३) केंद्र शासनाच्या शिक्षा मंत्रालय व शालेय शिक्षण व साक्षरता विभागाचे पत्र क्र. F No ५-२/२०२३-AE-२, दि.२१.०३.२०२५.
४) वित्त विभागाचे परिपत्रक, दि. ०५.१२.२०२३, दि. ०८.१२.२०२३, दि.२५.०७.२०२४ व दि.१२.०२.२०२५.

**प्रस्तावना:-**

नवभारत साक्षरता कार्यक्रम ही केंद्र पुरस्कृत योजना १ एप्रिल, २०२२ ते ३१ मार्च, २०२७ या कालावधीत राबविण्यात येणार आहे. देशातील १५ वर्षे आणि त्याहून अधिक वयोगटातील निरक्षर व्यक्तींना निरंतर शिक्षण देणे हे या योजनेचे उद्दीष्ट असून, ज्यामध्ये कला, विज्ञान, तंत्रज्ञान, संस्कृती, क्रीडा, मनोरंजन, तसेच स्थानिकांना स्वारस्य असेलेले विषय यांचा समावेश असेल. राष्ट्रीय शैक्षणिक धोरण २०२० च्या अनुषंगाने आणि सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पिय घोषणांच्या अनुषंगाने, प्रौढ शिक्षणाची एक नवीन योजना, "नव भारत साक्षरता कार्यक्रम सन २०२२-२३ ते २०२६-२७ या कालावधीत केंद्र शासनाच्या सूचनांनुसार राज्यात राबविण्यात येणार आहे. केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या रोड मॅपच्या अनुषंगाने संदर्भ क्र.१ अन्वये केंद्र पुरस्कृत नव भारत साक्षरता कार्यक्रम योजनेची राज्यात अंमलबजावणी करण्याच्या अनुषंगाने दि.१४.१०.२०२२ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. तसेच संदर्भ क्र.२ नुसार नवभारत साक्षरता कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी राज्यस्तरीय, जिल्हास्तरीय, गटस्तरीय व शाळांस्तरावर समिती स्थापन करण्यात आली आहे.

केंद्र शासनाने सन २०२४-२५ साठी संदर्भ क्र.३ येथील आदेशान्वये नवभारत साक्षरता कार्यक्रम योजनेंतर्गत अनुसूचित जाती घटक उपयोजनेकरीता केंद्र हिस्सापोटी रु.१,१२,५१,०००/- निधी उपलब्ध करुन दिला आहे. त्याअनुषंगाने सदर केंद्र हिस्याचा निधी व त्यास समरुप राज्य हिस्सा रु.७५,००,८००/- असा एकूण रु.१,८७,५१,८००/- इतका निधी सन २०२४-२५ या वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून वितरीत करण्याचा प्रस्ताव सादर करण्यात आला होता. त्यानुषंगाने प्रस्तुत निधी वितरणास मान्यता दिली आहे. सबब अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नवभारत साक्षरता योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये खालील लेखाशिर्षानिहाय रु.१,८७,५१,८००/- इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.हजारात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ या वर्षात सुधारित अर्थसंकल्पिय तरतूद | वितरणास मान्यता देण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | मागणी क्र.एन-०३<br>२२०२-सर्वसाधारण शिक्षण,<br>०४- प्रौढ शिक्षण,<br>७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>(०१) अनुसूचित जाती उपयोजना<br>(०१)(०२) नव भारत साक्षरता कार्यक्रम<br>(राज्य हिस्सा ४०%)<br>(२२०२ K७३१) | रु१२९२९ | रु. ७५००.८०० |
| २ | मागणी क्र.एन-०३<br>२२०२-सर्वसाधारण शिक्षण,<br>०४- प्रौढ शिक्षण,<br>७८९- अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना<br>(०१) अनुसूचित जाती उपयोजना<br>(०१)(०२) नव भारत साक्षरता कार्यक्रम<br>(केंद्र हिस्सा ६०%) ( २२०२K७२२) | रु. २८५५२ | रु. ११२५१ |
| **एकूण** | | रु.१८९१७ | **रु.** १८७५१.८०० |

२. प्रस्तुत निधीकरीता "नियंत्रक अधिकारी" म्हणून आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना व "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून लेखाधिकारी, शिक्षण संचालनालय (योजना) महाराष्ट्र राज्य, पुणे यांना घोषित करण्यात येत आहे.

३. जिल्हास्तरावर शिक्षणाधिकारी (योजना), जिल्हापरिषद यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. उपरोक्त प्रमाणे आर्थिक तरतुदीतून खर्च भागविण्यात यावा. तसेच, वितरीत निधीच्या विनियोगासंदर्भात जिल्हानिहाय माहिती शासनास उपलब्ध करुन द्यावी. सदर निधीचा विनियोग योग्य त्या बाबींवर करण्यात यावा.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाने संदर्भ क्रमांक ४ अन्वये वेळोवेळी दिलेल्या मान्यतेनूसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२५१८०६५८६४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

TUSHAR VASANT MAHAJAN

Digitally signed by TUSHAR VASANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORT DEPARTMENT, 2.5.4.20=19c6c23f510a80926e9b7ee5db235979452f3f9e8918118634069a6cc7a22b9f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A39CEF3C157B9EE6A2ABE5779ACF233682613F7B9C335D6BF4877267695CECA, cn=TUSHAR VASANT MAHAJAN
Date: 2025.03.25 18:07:40 +05'30'

**(तुषार महाजन)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री, शालेय शिक्षण, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
५. सचिव, साजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
८. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०. स्थानिक निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१३. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. शिक्षण संचालक (योजना) महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. संचालक, राज्य शैक्षणिक, संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१६. वित्त विभाग (व्यय-१४५/अर्थसंकल्प-८) मंत्रालय, मुंबई
१७. सह सचिव/उपसचिव (विद्यार्थी विकास/अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग मंत्रालय, मुंबई
१९. निवडनस्ती, (एसडी-२)